महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई ची स्थापना करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पंसाअ २०१७/प्र.क्र.१७६/कार्यासन-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०५ ऑक्टोंबर, २०१८

**प्रस्तावना** -

राज्यामध्ये पंजाबी भाषेचा विकास, भाषेचे संवर्धन, प्रगती तसेच पंजाबी व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारीक अदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीची स्थापना करुन त्यावर पुढे नमूद केल्याप्रमाणे शासकीय व अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या करण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

| अ.क्र. | नांव/हुद्दा | पद |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (अल्पसंख्याक विकास) | अध्यक्ष |
| २ | मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) | उपाध्यक्ष |
| ३ | सचिव/प्रधान सचिव/अप्पर मुख्य सचिव (अल्पसंख्याक विकास विभाग) | शासकीय सदस्य |
| ४ | उप/सह सचिव (अल्पसंख्याक विकास विभाग) | शासकीय सदस्य |
| | **ब) अशासकीय सदस्य** | |
| ५ | अशासकीय सदस्यांची नियुक्ती नामनिर्देशनाने करण्यात येईल. | |

२. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीवर नियुक्त करण्यात येणाऱ्या अशासकीय सदस्यांचा कालावधी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ३ वर्षाचा असेल. तथापि, अकादमीचा कार्यकाळ संपुष्टात आल्यानंतर अकादमीची प्रत्यक्ष पुनर्रचना होईपर्यंत किंवा शासनाच्या पुढील आदेशापर्यंत सदरची अकादमी कार्यरत राहील. त्याचप्रमाणे, सदर अकादमीवरील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या मुदतीपूर्वी केव्हाही संपुष्टात आणण्याचे अधिकार शासनास राहतील. अशासकीय सदस्यांची नियुक्ती शासनाकडून रद्द करण्यात आल्यास अकादमीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व शासकीय सदस्य हे अकादमीचे कामकाज पुढे चालू ठेवतील व पर्यायाने अकादमीचे अस्तित्व पुढे चालू राहील.

३. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी ही पंजाबी भाषेच्या सर्वांगिण विकासासाठी कार्य करेल. त्याचप्रमाणे राज्य भाषा मराठी व पंजाबी या दोन भाषांमध्ये भाषांतराद्वारे व अन्य साहित्यिक प्रयत्नाने कल्पनांची देवाण-घेवाण करण्यासाठी, शासन वेळोवेळी निर्धारीत करेल त्या योजना, त्या त्या योजनांसाठी विहित करण्यात आलेल्या कमाल खर्च मर्यादेचे काटेकोरपणे पालन करुन, कार्यान्वित करेल. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी मार्फत राबवावयाच्या योजना व त्यांची कमाल खर्च मर्यादा पुढील प्रमाणे विहित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | योजना | कमाल खर्च मर्यादा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | **पंजाबी भाषेतील पुस्तकांच्या महाराष्ट्रात प्रकाशनासाठी अनुदान योजना.**<br>महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीमार्फत राबविण्यात येणाऱ्या सदर योजनेंतर्गत महाराष्ट्रातील पंजाबी भाषेतील लेखक/कवी/विचारवंत/मराठी-पंजाबी अनुवादक यांना त्यांच्या साहित्यिक कृतीच्या (कथा/ कादंबरी/ नाटय लेखन/ काव्यसंग्रह/ अनुवाद/निबंध/संग्रह इत्यादींच्या) प्रकाशनासाठी आर्थिक सहाय्य मंजूर करण्यात येईल.<br>अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी कोणत्या पुस्तकांची (हस्तलिखित) निवड करावयाची आहे, तसेच कोणती पुस्तके अनुवादित करावयाची आहे, याची शिफारस करण्यासाठी ३ तज्ञ परिक्षकांची नियुक्ती करण्यात येईल. या तज्ञ परिक्षकांनी शिफारस केलेल्या पुस्तकांच्या पानांच्या संख्येवरुन अनुदानाची रक्कम ठरविण्यात येईल. तसेच, या उद्दिष्टासाठी मंजूर असलेल्या तरतुदीच्या मर्यादेत राहून पुस्तकांची संख्या व अर्थसहाय्याची रक्कम ठरविण्यात येईल. परिक्षकांनी संमती दिलेल्या हस्तलिखितांच्या लेखकांकडून हस्तलिखितांची डिटीपी प्राप्त झाल्यानंतरच अर्थसहाय्याच्या अनुदानाची रक्कम देण्यात येईल.<br>परिक्षकांना मानधन, प्रवासखर्च, राहण्याचा व जेवणाचा खर्च म्हणून प्रत्येकी रु.१०,०००/- इतकी ठोक रक्कम अनुज्ञेय असेल.<br>ज्या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी अनुदान दिले जाईल ते अनुदान त्याच पुस्तकाच्या प्रकाशनासाठी वापरण्यात येत आहे, हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.<br>अकादमीने अर्थसहाय्य मंजूर केलेल्या हस्तलिखितामध्ये प्रकाशनापूर्वी लेखकास कुठल्याही प्रकारचा फेरबदल करता येणार नाही. तसे करावयाचे असल्यास त्यासाठी पंजाबी अकादमीची पूर्व मंजूरी घेणे आवश्यक राहील. तसेच पुस्तकाच्या आतील सुरुवातीच्या प्रथम पृष्ठांवर या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीतर्फे सहायक अनुदान मिळाल्याबाबतची नोंद असणे आवश्यक असेल. | रु.२,००,०००/- |
| २ | **पंजाबी भाषेतील कवी/लेखक/विचारवंत यांच्या महाराष्ट्रात प्रसिध्द होणाऱ्या पुस्तकांना पारितोषिके देणे.**<br>पंजाबी भाषेतून महाराष्ट्रात प्रसिध्द होणाऱ्या कमाल ५ पुस्तकांना (कथा/कादंबरी/नाटय लेखन/काव्यसंग्रह/अनुवाद/निबंध/संग्रह) महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीमार्फत प्रत्येकी रु.१५,०००/- इतक्या ठोक रक्कमेची (इ.सी.एस.द्वारे प्रदान) पारितोषिके देण्यात येतील. दरवर्षी जानेवारी ते डिसेंबर (कॅलेंडर वर्ष) या कालावधीत पंजाबी भाषेतून प्रकाशित झालेल्या पुस्तकांमधून पात्र पुस्तकांची पारितोषिकांसाठी निवड करण्यात येईल. पुरस्कार देण्यासाठी पुस्तकांची निवड करताना पुस्तकांच्या गुणवत्तेबाबत कोणतीही तडजोड करण्यात येणार नाही.<br>पारितोषिके मंजूर करण्यासाठी पुस्तकांची निवड करण्याकरिता ३ तज्ञ परिक्षकांची नियुक्ती करण्यात येईल. हे परीक्षक पंजाबी भाषेतील नामवंत लेखक असायला हवेत. या परिक्षकांना मानधन, प्रवासखर्च व राहण्याचा व जेवणाचा खर्च म्हणून प्रत्येकी ठोक रु.१०,०००/- अनुज्ञेय असेल.<br>सदर योजनेंतर्गत पारितोषिके प्राप्त करण्यासाठी पुस्तके पाठविण्याविषयीच्या प्राथमिक अटी, शर्ती आणि कार्यपध्दती सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या असून या योजनेत सहभागी होऊ | रु.१,०५,०००/- |

| अ. क्र. | योजना | कमाल खर्च मर्यादा |
|---|---|---|
| | इच्छिणाऱ्या सर्व लेखक/कवी/विचारवंत यांनी या अटी, शर्ती व कार्यपध्दतीचे अवलंब करणे बंधनकारक राहील व अन्यथा त्यांच्या पुस्तकांना या योजनेत समाविष्ट केले जाणार नाही. | |
| ३ | **ग्रंथालयांना पंजाबी भाषेतील नियतकालिके व पुस्तके पुरविणे.**<br>सदर योजनेंतर्गत राज्यातील शासन मान्यताप्राप्त व नोंदणीकृत ग्रंथालयांना व ज्या शासन मान्यताप्राप्त व नोंदणीकृत ग्रंथालयांमध्ये पंजाबी भाषेची पुस्तके ठेवण्यात येतात, अशा ग्रंथालयांना पंजाबी भाषेतील विवक्षीत पुस्तके व नियतकालिके पुरविण्यात येतील.<br>पुरविण्यात येणारी पंजाबी भाषेतील पुस्तके व नियतकालिकांच्या यादीला शासनाची मान्यता घेण्यात येईल, व केवळ या मंजूर यादीतील पुस्तके व नियतकालिके सदर योजनेअंतर्गत पुरविण्यात येतील.<br>सदर पुस्तके ज्या ग्रंथालयांना पुरवावयाची आहेत त्या ग्रंथालयाच्या यादीला देखील शासनाची मान्यता घेण्यात येईल व केवळ या मंजूर यादीतील ग्रंथालयांनाच सदर योजनेअंतर्गत पुस्तके व नियतकालिके पुरविण्यात येतील. पंजाबी भाषेतील पुस्तके व नियतकालिकांची किंमत अकादमीकडून थेट प्रकाशकांना अदा केली जाईल.<br>सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी/योजनेत सहभागी होण्यासाठी शाळा वा महाविद्यालयातील ग्रंथालयाकडून अर्ज करण्यात आल्यास, संबंधित शाळा/ महाविद्यालय हे शासन मान्यता प्राप्त असणे आवश्यक राहील व यासाठी अर्ज करताना शाळांनी त्यांचे DIES क्रमांक नमूद करणे बंधनकारक असेल. | रु.३,९५,०००/- |
| ४ | **पंजाबी भाषेतील वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन (३,००,०००X२).**<br>राज्यातील कोणत्याही २ शहरांमध्ये प्रत्येकी रु.३ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेल्या साहित्यिक कार्यक्रम व प्रदर्शनाचे खुद्द पंजाबी अकादमीमार्फत आयोजन करण्यात येईल. कार्यक्रमांच्या आयोजनात विद्यापीठ/महाविद्यालयांची मदत घेण्यात येईल. या कार्यक्रमांमध्ये पंजाबी-मराठी साहित्याच्या आदान प्रदानावर भर देण्यात येईल, जेणे करुन दर्जेदार कार्यक्रमांचे आयोजन करणे शक्य होईल व त्यास पंजाबी भाषिक लेखकांबरोबरच जनतेचा देखील सकारात्मक प्रतिसाद मिळेल.<br>कार्यक्रमात सहभागी होणाऱ्या तज्ञ मार्गदर्शक/लेखक/अनुवादकांना येण्या जाण्याचे रेल्वेच्या वातानुकूलित दुसऱ्या वर्गाचे (AC-२) प्रत्यक्ष भाडे व मानधन देण्यात येईल व कार्यक्रमाच्या दिवसासाठी त्यांच्या निवासाची व जेवणाची सोय करण्यात येईल. | रु.६,००,०००/- |
| ५ | **पंजाबी भाषेतील कार्यशाळा, परिसंवाद इ. चे आयोजन (२,००,०००/- X २)**<br>राज्यातील कोणत्याही २ शहरामध्ये प्रत्येकी रु.२ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले वादविवाद स्पर्धा/काव्य स्पर्धा/निबंध लेखन स्पर्धा/रोल प्ले नाटक/क्रिएटिव्ह राईटिंग वर्कशॉप/ कार्यशाळा/ परिसंवाद चे खुद्द पंजाबी अकादमीमार्फत आयोजन करण्यात येईल. कार्यक्रमांच्या आयोजनात महाविद्यालय/शाळांची मदत घेण्यात येईल.<br>या योजनेंतर्गत प्रत्येक वर्षी वेगवेगळ्या शाळा/ महाविद्यालय निवडण्यात येईल व एका शाळा/महाविद्यालयात लागोपाठ २ वर्षापेक्षा अधिक वेळा या योजनेंतर्गत अशा कार्यक्रमांचे आयोजन करता येणार नाही, जेणेकरुन राज्यभरातील सर्व पात्र शाळा/महाविद्यालयांना या योजनेचा लाभ घेता येईल. | रु.४,००,०००/- |
| ६ | **"पंजाबी मेळाव्या" चे आयोजन** | रु.६,००,०००/- |

| अ. क्र. | योजना | कमाल खर्च मर्यादा |
|---|---|---|
| | प्रत्येक वर्षी राज्यातील कोणत्याही एका शहरामध्ये रु.६ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा व २-३ दिवस कालावधी असलेल्या “पंजाबी मेळाव्या” चे आयोजन करण्यात येईल. सदर “पंजाबी मेळाव्या” मध्ये पंजाबी भाषेचे काव्य संमेलन/ नाटके/ कार्यशाळा/ परिसंवाद इ. स्वरुपाच्या वाङमयीन/सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येईल. या सर्व कार्यक्रमांचे आयोजन खुद्द पंजाबी अकादमीमार्फत करण्यात येईल. सदर “पंजाबी मेळाव्या” च्या प्रत्यक्ष आयोजनापूर्वी त्यात सादर केल्या जाणाऱ्या कार्यक्रमांचा तपशील शासनास सादर करुन त्यास शासनाची पूर्वमान्यता घेणे आवश्यक राहील. | |
| ७ | **पंजाबी भाषेमधील उल्लेखनिय कामगिरीबद्दल पारितोषिके प्रदान करण्याबाबत.**<br>पंजाबी भाषेत विविध क्षेत्रात उल्लेखनीय कामगिरी केल्याबद्दल मान्यवरांना महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीतर्फे दर वर्षी पुढे नमूद केल्याप्रमाणे पुरस्कार प्रदान करण्यात येतील -<br>**अ) महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी जीवन गौरव पुरस्कार :-** प्रत्येक वर्षी, पंजाबी भाषेतून लिखाण करणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील एका सुप्रसिध्द व नामवंत लेखक/साहित्यीक वा कवी यांना, त्यांनी साहित्य क्षेत्रात केलेल्या योगदानाबद्दल “महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी जीवनगौरव पुरस्कार” प्रदान करण्यात येईल. सदर पुरस्कारात रु.१ लाख इतकी रक्कम इ.सी.एस. द्वारे, प्रतिकात्मक चेक, मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल व श्रीफळ चा समावेश असेल.<br>**ब) महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी पुरस्कार :-** प्रत्येक वर्षी पंजाबी भाषेतून लिखाण करणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील एका सुप्रसिध्द व नामवंत लेखक/साहित्यीक वा कवी यांना त्यांनी साहित्य क्षेत्रात केलेल्या योगदानाबद्दल “महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी पुरस्कार” प्रदान करण्यात येईल. सदर पुरस्कारात रु.५१ हजार इतकी रक्कम इ.सी.एस. द्वारे, प्रतिकात्मक चेक, मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल व श्रीफळचा समावेश असेल.<br>**क) नवोदित पंजाबी साहित्यिक पुरस्कार :-** पंजाबी भाषेतून लिखाण करणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील नवोदित लेखकांसाठी १ व नवोदित कवींसाठी १ असे एकूण २ “नवोदित पंजाबी साहित्यिक पुरस्कार” देण्यात येईल. सदर पुरस्कारात रु.२५,०००/- इतकी रक्कम इ.सी.एस.द्वारे, प्रतिकात्मक चेक, मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल व श्रीफळ चा समावेश असेल.<br>**ड) पंजाबी पत्रकारिता पुरस्कार :-** पंजाबी भाषेतून पत्रकारिता करणाऱ्या देश पातळीवरील १ व राज्य पातळीवरील १ अशा एकूण २ पत्रकारांना “पंजाबी पत्रकारिता पुरस्कार” प्रदान करण्यात येईल. सदर पुरस्कारात प्रत्येकी, रु.१५,०००/- इतकी रक्कम इ.सी.एस.द्वारे, प्रतिकात्मक चेक, मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल व श्रीफळ चा समावेश असेल.<br>**इ) शिक्षण सेवा पुरस्कार :-** राज्यात पंजाबी भाषेतून शिक्षण देणारे शिक्षक हे पंजाबी भाषेच्या प्रचार व प्रसारामध्ये प्रत्यक्ष भूमिका बजावतात ही बाब विचारात घेता, योग्य उमेदवारांच्या उपलब्धतेनुसार दरवर्षी, विद्यापीठ/ महाविद्यालय/शालेय स्तरावरील एकूण ५ पंजाबी भाषेच्या शिक्षकांना प्रत्येकी रु.१५,०००/- इतकी रक्कम इ.सी.एस.द्वारे, प्रतिकात्मक चेक, मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल व श्रीफळ चा समावेश असलेले “शिक्षण सेवा पुस्कार” पुरस्कार प्रदान करण्यात येतील.<br>**ई) विशेष पुरस्कार :-** महाराष्ट्र राज्यात पंजाबी भाषेचा प्रचार व प्रसार करण्याच्या क्षेत्रात महत्वाची कामगिरी बजावणाऱ्या एकूण ३ व्यक्तींना विशेष पुरस्काराच्या स्वरुपात प्रत्येकी रु.१५,०००/- इतकी रक्कम इ.सी.एस.द्वारे, प्रतिकात्मक चेक | रु.७,००,०००/- |

| अ. क्र. | योजना | कमाल खर्च मर्यादा |
|---|---|---|
| | अधिक मानचिन्ह, प्रमाणपत्र, शाल, श्रीफळ यांचा समावेश असलेले “विशेष पुरस्कार” प्रदान करण्यात येतील.<br>**पुरस्कार प्राप्त कर्त्यांना अनुज्ञेय भत्ते/सोयी :-**<br>वरील पुरस्कारांपैकी “महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी जीवनगौरव पुरस्कार” व “महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी पुरस्कार” या पुरस्कारांच्या पुरस्कार प्राप्त व्यक्ती व त्यांची पत्नी/पती यांना त्यांच्या निवासाच्या शहरापासून मुंबईला रेल्वेच्या एसी-२ श्रेणीने येण्या जाण्याचा प्रवास खर्च अनुज्ञेय राहील.<br>सर्व पुरस्कारांच्या पुरस्कार प्राप्त कर्त्यांची निवासाची व जेवणाची सोय ठेवण्यात येईल.<br>वरील सर्व पुरस्कार वितरण सोहळ्याचे आयोजन करण्यासाठी हॉलचे भाडे, पुरस्कार वितरण समारंभाचा खर्च, प्रवास भाडे, राहण्याचा व जेवणाचा खर्च, कार्यकर्त्यांचे मानधन, प्रतिकात्मक चेक, मानचिन्हे, प्रमाणपत्रे, शाल, श्रीफळ इ. वरील संकीर्ण स्वरुपाचा खर्चासाठी रु.३,५०,०००/- (अंदाजे) इतक्या रक्कमेची तरतूद असेल. | |

महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी द्वारे केली जाणारी सर्व प्रदाने केवळ इ.सी.एस. प्रणाली द्वारे करण्यात येतील.

४. राज्य शासनाच्या अधिकारात असलेल्या फोर्ट परिसरातील जागेत किंवा गोकुळदास तेजपाल रुग्णालय प्रशासकीय इमारतीत उपलब्ध होणाऱ्या जागेत अथवा सदर जागा उपलब्ध न झाल्यास या परिसरात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मार्गदर्शक तत्वानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य आकदमीच्या कार्यालयासाठी भाडेपट्टीवर किमान ७०० चौ.फूट जागा उपलब्ध करण्यास देण्यात येईल.

५. नव्याने पद निर्मिती होईपर्यत, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीचे प्रशासकीय कामकाज पाहणाऱ्या अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालीच, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीचे कामकाज करण्यात येईल.

६. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या आस्थापनेकरिता पुढील तक्त्यात नमूद ४ पदे नव्याने निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | नव्याने निर्माण करावयाच्या पदांची संख्या | सद्य:स्थितील वेतनश्रेणी(रुपये) |
|---|---|---|---|
| १ | अधिक्षक | १ | ९३००-३४८००+ग्रे.पे.४३०० |
| २ | सहाय्यक | १ | ९३००-३४८००+ग्रे.पे.४२०० |
| ३ | लिपिक-टंकलेखक | १ | ५२००-२०२००+ग्रे.पे.१९०० |
| ४ | शिपाई | १ | ४४४०-७४४०+ग्रे.पे.१३०० |
| | **एकूण** | ४ | |

७. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्याची जबाबदारी अकादमी कार्यालयाची असेल. अर्थात या कार्यक्रमांसाठी महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या अध्यक्ष/ उपाध्यक्ष/कार्याध्यक्ष यांच्या मार्गदर्शनानुसार व सहकार्याने तसेच प्रचलित शासकीय नियमांनुसार विहित पध्दतीचा अवलंब करुन कार्यक्रमांचे आयोजन करण्याची व त्यासाठी अनुज्ञेय असलेला निधी खर्च करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या अधिकाऱ्यांची राहील.

८. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीवर नियुक्त केलेल्या सदस्यांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.प्रवास १०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.०३/०३/२०१० च्या परिच्छेद १२ अन्वये राज्य स्तरावरील समिती/ मंडळ/ आयोग यावर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांना अनुज्ञेय ठरविण्यात आलेल्या दरांनी प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. प्रवास भत्त्यांच्या देयकावर प्रति स्वाक्षरी करण्याचे अधिकार शासन नियुक्त करेल त्या आहरण व संवितरण अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग यांना असतील.

९. नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या आस्थानाकरिता ४ पदांसाठी प्रचलित वेतनश्रेणीनुसार वेतनासाठी रु. ११,८०,०००/- तसेच कार्यालयीन खर्चासाठी रु.५,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यास तसेच महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीतर्फे विविध योजना राबविण्यासाठी ३१, सहाय्यक अनुदाने या शीर्षाखाली रु.३०,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. या योजनेसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची व आवश्यक तरतूद करण्याची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८१००५१७०२२१०९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shyam Arjunrao Tagade

Digitally signed by Shyam Arjunrao Tagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ebdccd1ea7bd29723d76653e72dddcc5cf97ff4fb69ce412d0d3c6d5c23adc3e, cn=Shyam Arjunrao Tagade
Date: 2018.10.06 14:56:55 +05'30'

**( श्याम तागडे )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव (पत्राने),
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.मंत्री (अल्पसंख्याक) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा सदस्य/विधानपरिषद, विधानभवन,मुंबई-३२
८. सर्व मा.संसद सदस्य/विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
९. मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१०. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. महासंचालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१४. मा.महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१८.अवर सचिव (का-४), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फ
२०. अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी, मुंबई.
२१. निवड नस्ती/कार्यासन-४, संग्रहार्थ.

## परिशिष्ट "अ"

**अटी व शर्ती-:**

१. वाड:मयीन पुरस्कारासाठी स्थानिक वर्तमानपत्राद्वारे जानेवारी ते डिसेंबर या कालावधीत प्रसिध्द झालेल्या मूळ साहित्य कृती, अनुवादित व एखाद्या साहित्यावर आधारित, शिक्षण, तंत्रज्ञान व संशोधनपर साहित्य कृती, पुरस्कारासाठी विचारात घेतल्या जातील. मात्र डॉक्टरेटसाठी (पी.एच.डी.) प्रसिध्द केलेले निबंध/साहित्य/पुस्तके वाङ्:मय पुरस्कारासाठी विचारात घेतली जाणार नाहीत, अर्थात अशा पुस्तकांना पुरस्कार दिले जात नाहीत.

२. वाङ्:मय पुरस्कारासाठी लेखक/कवी हे महाराष्ट्र राज्यात स्थायी अधिवासी (डोमेसाईल इन महाराष्ट्र) असावेत. त्यांचा महाराष्ट्रात किमान १५ वर्ष निवास असणे आवश्यक आहे.

३. वाड:मय पुरस्कारासाठी गतवर्षातील जानेवारी ते डिसेंबर या कालावधीत प्रसिध्द झालेल्या व प्रथम आवृत्ती असलेल्या साहित्य कृती पात्र असतील.

४. वाड:मय पुरस्कारासाठी हस्तलिखित किंवा टंकलिखित स्वरुपातील साहित्य कृती विचारात घेतल्या जाणार नाहीत.

५. पुरस्कारासाठी विहित नमुन्यातील अर्ज सहा प्रतीसह वर्तमानपत्रात प्रसिध्द केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत विचारात घेतल्या जातील. त्यानंतर अकादमी कार्यालयात प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. तसेच या अर्जासोबत प्राप्त झालेली पुस्तके लेखकास परत केली जाणार नाहीत.

६. विहीत अर्जासोबत लेखक/कवीने प्रकाशित केलेली साहित्य कृती ही मूळ साहित्य कृती किंवा हे अनुवादित साहित्य असून अनुवादासाठी मुळ लेखकाची अनुमती मिळविल्याच्या परवानगी पत्राची प्रमाणित प्रत पाठविणे आवश्यक आहे.

७. साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळालेली साहित्य कृती किंवा ज्या साहित्य कृतीस अकादमीने किंवा साहित्य अकादमीने पुरस्कार दिला आहे, अशा साहित्य कृतीमधील काही मजकूर समाविष्ट केलेल्या साहित्य कृती पंजाबी अकादमीच्या वाड:मय पुरस्कारासाठी विचारात घेतल्या जाणार नाहीत.

८. ज्या साहित्यिकांना २ वर्ष आधी पुरस्कार मिळाला आहे, त्याचा चालू वर्षाच्या पुरस्कार योजनेत विचार केला जाणार नाही. तसेच, या वर्षात पुरस्कार मिळालेल्या व्यक्तिंचा पुढील २ वर्षासाठी विचार केला जाणार नाही.

९. साहित्य कृतीचे एकापेक्षा अधिक लेखक असतील तर सर्व सह लेखकाची अथवा एका सहलेखकास यापूर्वी वरील अट क्रमांक ८ लागू होत असेल तर अशी साहित्य कृती पुरस्कारासाठी विचारात घेतली जाणार नाही.

१०. दिवंगत लेखकाची साहित्य कृती स्पर्धेसाठी विचारात घेतली जाणार नाही.

११. आत्मचरित्रपर साहित्य कृती संबंधित लेखन स्वतंत्र आहे अथवा ज्याच्या चारित्र्यावर आधारित कृती आहे, अशा लेखकाने अथवा त्यांच्या नातेवाईकांनी लेखी अनुमती दिल्यास अशी साहित्य कृती पुरस्कारासाठी विचारात घेतली जाईल.

१२. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीवर अथवा पंजाबी साहित्य अकादमीच्या पुरस्कार समितीच्या सदस्यावर कोणत्याही प्रकारे दबाव आणणारी व्यक्ती पंजाबी साहित्य अकादमीतर्फे दिल्या जाणाऱ्या कोणत्याही पुरस्कारासाठी अपात्र ठरेल. तसेच, अशा व्यक्ती पुढे कधीही पुरस्कारासाठी पात्र राहणार नाही .

-=₀₀₀OOOOO₀₀=-